(२) १९

**प्रशासकीय मान्यता-**
राजापूर,जिल्हा रत्नागिरी येथे दिवाणी फौजदारी न्यायालयाकरिता इमारत बांधण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीसीबी-२९०९/८७८/प्र.क्र.१२९/का-१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,दिनांक:- ११ जून, २०१०.

पहा :- १) प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.वी(डब्ल्यु) ६०७४/१९९१,दिनांक-९ नोव्हेंबर,२००९.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, रत्नागिरी यांचे पत्र क्र.डी-१/१९४८/२००९, दि.२४ ऑगस्ट,२००९.

शासन निर्णय:-राजापूर,जिल्हा रत्नागिरी येथे दिवाणी व फौजदारी न्यायालयाकरिता इमारत बांधण्याच्या रु.३,२९,११,१२६/-(रुपये तीन कोटी एकोणतीस लक्ष अकरा हजार एकशे सव्वीस फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

रुपये

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकाम | २,१६,००,००० |
| २ | भूविकास | ९,२३,३७६ |
| ३ | कंपाऊंड वॉल | ७,४६,३७९ |
| ४ | अंतर्गत रस्ते | ३,६७,०७५ |
| ५ | जुनी इमारत तोडणे | ५,११,२९६ |
| ६ | ४ % आकस्मिक खर्च | ८,६४,००० |
| ७ | पाणीपुरवठा आणि मलनि:सारण ८% | १७,२८,००० |
| ८ | ११% विद्युतीकरण | २३,७६,००० |
| ९ | अरबोरी कल्चर आणि बागकाम | १,००,००० |
| १० | ध्वज स्तंभ | २५,००० |
| ११ | विद्युत लाईन सरकविणे | ८०,००० |
| १२ | जनरेटर | ३,५०,००० |
| १३ | १५ टक्के फर्निचर | ३२,४०,००० |
| | एकूण | ३,२९,११,१२६ |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) काम सुरु करण्यापूर्वी जमीनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी.
२) मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेवूनच काम सुरु करावे.

३) "अंतर्गत रस्ते, संरक्षण भिंत, इत्यादि बांधकामाची छेद नकाशासह मापे विस्तृत अंदाजपत्रकात समाविष्ट करुनच काम सुरु करण्यात यावे."

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-०५१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-६७/इमा-२, दिनांक-१५.२.२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय,मुंबई,
प्रबंधक (निरीक्षणे-२),उच्च न्यायालय (अपिल शाखा),मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,रत्नागिरी,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक,मुंबई,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग,रत्नागिरी
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,राजापूर,जि.रत्नागिरी,
जिल्हा कोषागार अधिकारी,रत्नागिरी,
उप कोषागार अधिकारी,राजापूर, जि.रत्नागिरी,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ,१८ वा मजला,नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर,मुंबई-३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई,
कक्ष अधिकारी, का. ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.